# महाराष्ट्र शासन

क्रमांक:मविसे १०/२००८/प्र.क्र.१९४/आस्था-३
ग्राम विकास व जलसंधारण विभाग,
मंत्रालय,मुंबई-४०० ०३२
दिनांक:- १९ मार्च, २०१०

विषय:-श्री.आर.बी.मरस्कोल्हे, सेवानिवृत्त महाराष्ट्र विकास सेवा गट-अ चे अधिकारी यांना महाराष्ट्र विकास सेवा गट-अ पदाचा मानीव दिनांक मंजूर करणेबाबत.

**आदेश**

श्री. आर.बी.मरस्कोल्हे, सेवानिवृत्त महाराष्ट्र विकास सेवा गट-अ चे अधिकारी यांनी महाराष्ट्र विकास सेवा गट-अ या संवर्गात त्यांच्या पेक्षा कनिष्ठ असलेल्या परंतु त्यांच्या अगोदर महाराष्ट्र विकास सेवा गट-अ पदावर पदोन्नत झालेल्या श्रीमती एन.एस. अप्रे यांच्या महाराष्ट्र विकास सेवा गट-अ पदावरील पदोन्नतीचा दिनांक मानीव दिनांक म्हणून मंजूर करण्याबाबत शासनास विनंती केली होती. त्यानुसार त्यांच्या विनंतीची तपासणी करुन त्यांना गट-अ संवर्गात सेवा कनिष्ठ असलेल्या श्रीमती अप्रे यांच्या महाराष्ट्र विकास सेवा गट-अ पदावरील पदोन्नतीचा दिनांक ७.४.१९९९ ( प्रत्यक्षात कार्यभार स्वीकारल्याचा दिनांक ) हा महाराष्ट्र विकास सेवा गट-अ पदावरील पदोन्नतीचा मानीव दिनांक मंजूर करण्यात येत आहे. श्री.मरस्कोल्हे यांना महाराष्ट्र विकास सेवा गट-अ पदावरील पदोन्नतीचा मानीव दिनांक ७.४.१९९९ हा केवळ सेवाजेष्ठता आणि वेतन निश्चितीसाठी देण्यात येत आहे. सदर मानीव दिनांकाच्या अनुषंगाने वेतन निश्चितीच्या फरकाची रक्कम त्यांना प्रत्यक्ष पदोन्नतीपासून देय होईल.

२. उक्त नमूद मानीव दिनांक महाराष्ट्र विकास सेवा गट-अ च्या निवडसूच्यांचा महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या मान्यतेच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

३. महाराष्ट्र विकास सेवा गट-अ संवर्गातील दिनांक ७.४.१९९९ या मानीव दिनांकानुसार श्री .मरस्कोल्हे यांची वेतन पुनर्निश्चिती करण्याची कार्यवाही विभागीय आयुक्त, नागपूर विभाग, नागपूर यांनी करावी.

४.	हे आदेश सामान्य प्रशासन विभाग अनौपचारीक संदर्भ क्रमांक १२७० /०९/ १२, दिनांक ३०.१०.२००९ आणि वित्त विभाग अनौपचारीक संदर्भ क्रमांक २२/१०/सेवा-३, दिनांक ८.१.२०१० अन्वये प्राप्त सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५.	सदर आदेश महाराष्ट्र शासनाच्या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०१००३१९१७२७४२००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( स.रि.बांदेकर-देशमुख )
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रति,

१.	विभागीय आयुक्त, नागपूर विभाग, नागपूर
२.	श्री.आर.बी.मरस्कोल्हे, सेवानिवृत्त महाराष्ट्र विकास सेवा गट-अ चे अधिकारी ( विभागीय आयुक्त, नागपूर विभाग यांचे मार्फत )
३.	महालेखापाल, महाराष्ट्र राज्य-२ नागपूर
४.	सामान्य प्रशासन विभाग का.क्र.१२, मंत्रालय, मुंबई-३२
५.	वित्त विभाग, सेवा-३. मंत्रालय,मुंबई-३२
६.	निवडनस्ती.

D:\D\PAWAR 2010\CR 194 marskolhe.lwp